**व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील महाराष्ट्र शिक्षण सेवा संवर्गातील गट-ब (तांत्रिक) (राजपत्रित) या पदावरील अधिकाऱ्यांचे वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर सेवा पुनर्विलोकन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय: व्यशिअ-२०२५/प्र.क्र.१३३/व्यशि-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २९ एप्रिल, २०२५

**संदर्भ:-** (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दिनांक १० जून, २०१९.
(२) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.पुनर्वि-२०२२/प्र.क्र.०१/व्यशि-१, दिनांक ०७ जानेवारी, २०२२.
(३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.०३/आस्था-१/(५०/५५ पुनर्विलोकन)/२०२५/१५९, दिनांक २६ मार्च, २०२५.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम १० (४) व नियम ६५ अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्ष अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी, त्यांचे सेवा पुनर्विलोकन करून त्यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे. त्याअनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र. (१) येथील दिनांक १० जून, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सेवापुनर्विलोकनासंबंधी कार्यपध्दती व सर्वसाधारण सूचना विहित केल्या आहेत. त्यास अनुसरून व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (तांत्रिक) (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी यांच्या सेवापुनर्विलोकनाकरिता या विभागाच्या संदर्भ क्र. (२) येथील दिनांक ०७ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली विभागीय पुनर्विलोकन समिती गठीत करण्यात आली आहे.

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील महाराष्ट्र शिक्षण सेवा या संवर्गातील मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा किंवा केंद्र, गट-ब (तांत्रिक) (राजपत्रित), महाराष्ट्र शिक्षण सेवा आणि प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था किंवा उप प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था किंवा सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, गट-ब (तांत्रिक) (राजपत्रित), महाराष्ट्र शिक्षण सेवा या पदावरील अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांचे सेवापुनर्विलोकन करण्यासाठीचा विहीत प्रस्ताव संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण

संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये प्राप्त झाला होता. सदर प्रस्ताव अपर मुख्य सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग यांच्या अध्यक्षतेखालील विभागीय पुनर्विलोकन समितीस व सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेस्तव सादर करण्यात आला. विभागीय पुनर्विलोकन समितीने सदर अधिकाऱ्यांच्या सेवेचे मूल्यमापन करून केलेल्या शिफारशी नुसार ज्या अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी सेवेत राहण्यासाठी पात्र ठरविले आहे त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

विभागीय पुनर्विलोकन समितीने केलेल्या शिफारशीस अनुसरुन व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील महाराष्ट्र शिक्षण सेवा या संवर्गातील मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा किंवा केंद्र, गट-ब (तांत्रिक) (राजपत्रित), महाराष्ट्र शिक्षण सेवा आणि प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था किंवा उप प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था किंवा सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, गट-ब (तांत्रिक) (राजपत्रित), महाराष्ट्र शिक्षण सेवा या पदावरील सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची सेवा त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यानंतर चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये नमूद अधिकाऱ्यांची सेवा त्यांच्या वयाच्या ५०/५५ वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झालेनंतर पुढे चालू ठेवण्यास मान्यता मिळाल्याबाबतची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२९१७३७२६०६०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINOD VISHWANATH CHAUDHARI

Digitally signed by VINOD VISHWANATH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=d3a61cf46d54b669ba9f5d9ba4f32dd8ed54a7ea64e7d1483ae325db5b8a3005, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8933E15B4DBF1243939DE4EFCC94AD1431E1DE56B3F2F32F01837980F363FA8D, cn=VINOD VISHWANATH CHAUDHARI
Date: 2025.04.29 17:38:35 +05'30'

**( विनोद वि. चौधरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), १/२, मुंबई/नागपूर.
२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/नागपूर.
३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
५) सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
६) संबंधित अधिकारी (संचालक यांच्यामार्फत)
७) निवडनस्ती (व्यशि-१)

**शासन निर्णय: व्यशिअ-२०२५/प्र.क्र. १३३/व्यशि-१, दिनांक २९/०४/२०२५ सोबतचे प्रपत्र**

---

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा किंवा केंद्र, गट-ब (तांत्रिक) (राजपत्रित), महाराष्ट्र शिक्षण सेवा आणि प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था किंवा उप प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था किंवा सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, गट-ब (तांत्रिक) (राजपत्रित), महाराष्ट्र शिक्षण सेवा (वेतनश्रेणी: एस-१७ (४७६००-१५११००) या संवर्गातील वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झालेनंतर सेवा पुढे चालू ठेवण्यास पात्र ठरलेल्या अधिकाऱ्यांची यादी.

| अ.क्र | शासकीय अधिकाऱ्यांचे पूर्ण नाव व त्यांचे धारण केलेले पद |
|---|---|
| १. | श्री. निखिल अशोक कुलकर्णी,<br>प्राचार्य, औ.प्र.संस्था कोरेगाव |
| २. | श्री. राजेश गोवर्धनजी चुलेट,<br>प्राचार्य, औ.प्र.संस्था, नेर |
| ३. | श्री. सुनील गोविंद कुमावत,<br>मुख्याध्यापक, शा.ता.वि नाशिक |
| ४. | श्री. विजय मुकुंदराव वानखेडे,<br>उपप्राचार्य, औ.प्र.संस्था, चिपळूण |
| ५. | श्री. विजयकुमार जयसिंगराव नार्वेकर,<br>उपप्राचार्य, औ.प्र.संस्था, कोल्हापूर |
| ६. | श्री. भालचंद्र गणपत रासेकर,<br>मुख्याध्यापक, शा.तां.वि., वरोरा |
| ७. | श्री. पंडीत शामराव म्हस्के,<br>प्राचार्य, औ.प्र.संस्था, औरंगाबाद (मुं) |
| ८. | श्री. संजय बापुराव गायकवाड,<br>स.प्र.स.(तां), मुख्य कार्यालय, मुंबई |
| ९. | श्री. प्रकाश सुमनलाल जैन,<br>उपप्राचार्य, औ.प्र.संस्था, नवापूर |
| १०. | श्रीमती सुनिता निवृत्तीराव पवार (सुरळकर),<br>स.प्र.स (तां), मुख्य कार्यालय, मुंबई |
| ११. | श्री.प्रविण वासुदेवराव गुल्हाणे,<br>प्राचार्य, औ.प्र.संस्था, लोणार |
| १२. | श्री. विरेंद्रकुमार अशोक पोटदुखे,<br>मुख्याध्यापक, शा.तां.वि, हिंगणघाट |

*****